१% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणा-या रकमा संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याबाबत....
सन २०१८- २०१९

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१८/प.क्र.२१/नवि-३२
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: २९ सप्टेंबर ,२०१८

वाचा :-

(१) वित्त विभाग महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग चार-ब, २९ जून,२०१७
(२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.
(३) शासन निर्णय क्रमांकः स्थासंक-२०१८/प.क्र. २१/नवि-३२ दिनांक ०१ जून, २०१८

प्रस्तावना :-

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम (१९४९ चा ५९) याच्या कलम १४९ अ मध्ये सुधारणा करण्यात आली असून यामध्ये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम (१९५८ चा ६०), याअन्वये स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यासंबंधी संलेखांवर बसवावयाच्या मुद्रांक शुल्कात, जर असा कोणताही संलेख हा, शहरात स्थित असलेल्या स्थावर मालमत्तेच्या संबंधातील असेल तेव्हा, विक्री किंवा देणगीसंबंधीच्या संलेखाच्या बाबतीत, अशा स्थित असलेल्या मालमत्तेच्या मूल्यावर, आणि फलोपभोग गहाणासंबंधीच्या बाबतीत, संलंखात मांडण्यात आलेल्या त्या संलेखाद्वारे प्रतिभूत केलेल्या रकमेवर, एक टक्का या दराने अधिभार आकारण्यात येईल. या अनुषंगाने राज्यातील २५ महानगरपालिकांना देय असलेली १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणारी माहे जुन, जुलै, व ऑगस्ट २०१८ करीता देय रक्कम रू. ३३१,०३,२८,१५४.०० कोटी महानगरपालिकांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

१% मुद्रांक शुल्कापोटी सन २०१८-१९ मधील माहे जून, जुलै व २०१८ करीता महानगरपालिकांची एकुण रक्कम रु. ३३१,०३,२८,१५४.०० कोटी (अक्षरी रूपये तिनशे एकतीस कोटी तीन लक्ष अठ्ठावीस हजार एकशे चौपन्न फक्त) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

## सन २०१८-१९ मधील जून, जुलै व ऑगस्ट, २०१८ करीता २५ महानगरपालिकांना १% मुद्रांक शुल्कापोटी वितरीत करावयाचे अनुदान

| अ.क्र. | महानगरपालिकेचे नाव | माहे जून, जुलै व ऑगस्ट २०१८ करीता एकुण देय रक्कम |
|---|---|---|
| १ | नागपूर | १९,०६,०९,६४७.०० |
| २ | चंद्रपूर | १४,५६,५१२.०० |
| ३ | अमरावती | ४,३१,४१,५२६.०० |
| ४ | अकोला | ०.०० |
| ५ | औरंगाबाद | ५,६८,८७,२६०.०० |
| ६ | परभणी | ०.०० |
| ७ | लातूर | ११,६३,३७३.०० |
| ८ | नांदेड-वाघाळा | १,७०,८४,३५५.०० |
| ९ | नाशिक | १५,९७,४६,७३९.०० |
| १० | मालेगाव | २७,८५,८२१.०० |
| ११ | धुळे | ०.०० |
| १२ | जळगाव | २,२१,६१,३९०.०० |
| १३ | अहमदनगर | १,९४,८७,७९६.०० |
| १४ | पुणे | ७६,९४,१०,१२६.०० |
| १५ | पिंपरी-चिंचवड | ३८,८१,०१,५५२.०० |
| १६ | कोल्हापूर | २,८६,९३,६६२.०० |
| १७ | सोलापूर | ०.०० |
| १८ | सांगली | २,६५,४८,९३५.०० |
| १९ | मिरा भाईंदर | २५,८५,४५,४४९.०० |
| २० | वसई-विरार | २०,८७,२५,५३८.०० |
| २१ | भिवंडी-निजामपूर | ३,०८,२६,८१३.०० |
| २२ | उल्हासनगर | १,४७,३२,१८२.०० |
| २३ | कल्याण-डोंबिवली | २७,६०,२३,३०१.०० |
| २४ | ठाणे | ५४,७४,२६,५२४.०० |
| २५ | नवी मुंबई | २४,६७,६९,६५३.०० |
| | एकुण | ३३१,०३,२८,१५४.०० |

टिप :- १. अकोला, परभणी,धुळे, सोलापूर या महानगरपालिकांकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास देय असलेली/पूर्वीच्या अती प्रदानाची वसूली केल्यानंतर त्यांना कोणतेही अनुदान देय ठरत नाही.

२. चंद्रपूर व लातुर यांच्या बाबतीत महानगरपालिकांकडून महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या थकबाकीची प्रमाणशीर वसूली केल्यानंतर उर्वरीत देय रक्कम दर्शविण्यात आली आहे.

०२. सदर अनुदान उपरोल्लेखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर अनुदान कोषागारातून आहरण करून संबंधित महानगरपालिकांना तात्काळ वितरीत करावे.

०३. याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०२, मुद्रांक शुल्क (०१) जकात रद्द केल्यामुळे मुद्रांक शुल्काचे अभिहस्तांकन (०१)(०१) स्थानिक संस्था करांऐवजी जकातीचे पुन:स्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रामधील मुद्रांक शुल्कावरील १ टक्के अधिभार महानगरपालिकेसाठी देण्याच्या दृष्टिने (३६०४०९२४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०४. सदर १% अधिभारापोटी जमा रकमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणाऱ्या या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व याबाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व कागदपत्रे महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना, आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

०५. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८.मधील सर्व अटी व शर्तींची या संदर्भात पूर्तता होत असून सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थस-२०१७/प्र.क्र.६९/अर्थ-३ दिनांक ०२ फेब्रुवारी २०१८ अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

०६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक. २०१८०९२९१२३३०६७५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Shashikant Kashinath Sanap

Digitally signed by Shashikant Kashinath Sanap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=15a77c0947426b11b7c7f646f29f3b1a483717eec6d16a0ebd196cbc7f25d62f, cn=Shashikant Kashinath Sanap
Date: 2018.09.29 12:38:18 +05'30'

**(शशिकांत का. सानप)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संबंधित जिल्हाधिकारी.
२. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर)
४. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
७. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.
८. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६,मंत्रालय,मुंबई.
०९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
११. कार्यासन अधिकारी नवि-४, मंत्रालय,